नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांची सरळसेवा/ पदोन्नतीने नियुक्ती/ पदस्थापना करण्यासंदर्भात नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१६/प्र.क्र.८३८/म-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०७ एप्रिल, २०१७.

**वाचा:-**

**शासन निर्णय क्रमांक- सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२९०/कार्या-१२, दि.१९.११.२०१६**

**प्रस्तावना:-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या संदर्भात त्यांच्या सरळसेवेने/ पदोन्नतीने नेमणूका/ पदस्थापना करताना संबंधित प्रकरणे कोणत्या स्तरापर्यंत सादर करावी व कोणत्या स्तरावर अंतिम निर्णय घ्यावेत, याबाबत विशिष्ट आदेश नसल्याने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सदर संदिग्धता शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाने दूर केली आहे. उक्त शासन निर्णयांतर्गत तक्त्यातील अ.क्र.३ येथे गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील पदांकरीता स्तंभ-३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्यांत आले आहेत. त्याअनुषंगाने, गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदांवर सरळसेवेने/ पदोन्नतीने करावयाच्या नेमणूका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी नियुक्ती प्राधिकारी कोण असतील, यासंदर्भात संबंधित प्रशासकीय विभागांनी पदनिहाय नियुक्ती प्राधिकाऱ्यांचे पदनाम स्वतंत्र आदेशान्वये घोषित करण्याचे शासनाने निदेशित केले आहे. सबब, त्याअनुषंगाने नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदांसाठी पदनिहाय नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नोंदणी व मुद्रांक विभागातील गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांच्या सरळसेवेने/ पदोन्नतीने नेमणूका/ पदस्थापना करताना संबंधित प्रकरणी कोणत्या स्तरावर अंतिम निर्णय घ्यावेत याकरीता या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्यांत येत आहेत:-

| अ.क्र. | पदे | नियुक्ती प्राधिकारी |
|---|---|---|
| १. | (i) दुय्यम निबंधक श्रेणी-१ आणि मुद्रांक निरिक्षक गट-ब (अराजपत्रित)<br>(ii) सहाव्या वेतन आयोगानुसार पे बँड रु.९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० या वेतनश्रेणीत वेतन घेणारे गट-ब (अराजपत्रित) चे अन्य कर्मचारी. | नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

| | | |
|---|---|---|
| २. | वरिष्ठ लिपिक आणि पर्यवेक्षक (पे बँड रु.५२००-२०२०० + ग्रेड पे २४००) या वेतनश्रेणीत वेतन घेणारे गट-क मधील कर्मचारी. | नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| ३. | कनिष्ठ लिपिक (पे बँड रु.५२००-२०२०० + ग्रेड पे १९००), व<br>वाहनचालक (पे बँड रु.५२००-२०२०० + ग्रेड पे १९००) या वेतनश्रेणीत वेतन घेणारे गट-क मधील कर्मचारी. | (१) संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक<br>(प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई व नोंदणी महानिरीक्षक कार्यालय व शासकीय छायाचित्र नोंदणी कार्यालय वगळून)<br>(२) अपर मुद्रांक नियंत्रक<br>(प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई व त्यांचे अखत्यारीतील मुद्रांक जिल्हाधिकारी कार्यालयांतील कर्मचाऱ्यांसाठी)<br>(३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>(नोंदणी महानिरीक्षक कार्यालय व शासकीय छायाचित्र नोंदणी कार्यालयातील कर्मचाऱ्यांसाठी) |
| ४. | शिपाई (पे बँड रु.४४४०-७४४० + ग्रेड पे १३००) या वेतनश्रेणीत वेतन घेणारे गट-ड मधील कर्मचारी. | (१) संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक<br>(प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई व नोंदणी महानिरीक्षक कार्यालय व शासकीय छायाचित्र नोंदणी कार्यालय वगळून)<br>(२) अपर मुद्रांक नियंत्रक<br>(प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई व त्यांचे अखत्यारीतील मुद्रांक जिल्हाधिकारी कार्यालयांतील कर्मचाऱ्यांसाठी)<br>(३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>(नोंदणी महानिरीक्षक कार्यालय व शासकीय छायाचित्र नोंदणी कार्यालयातील कर्मचाऱ्यांसाठी) |

०२. “महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५ मधील नियम ११ (२) नुसार नोंदणी व मुद्रांक विभागातील उपरोक्त गट-ब (अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने आणि पदोन्नतीने नियुक्ती करतांना महसूली विभाग वाटपाचे

अधिकार प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील राज्यस्तरीय विभागप्रमुख म्हणून नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रदान करण्यांत आले आहेत.

०३. वरील नियुक्ती प्राधिकारी हे वर नमूद पदांकरीता सरळसेवेने/ पदोन्नतीने करावयाच्या नेमणूका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी सक्षम असतील. मात्र संबंधित कर्मचाऱ्यांच्या बदली करण्यासंदर्भात "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५" च्या तरतुदीनुसार घोषित केलेले सक्षम प्राधिकारी अंतिम निर्णय घेतील.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०७२१५३२६६४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manu Kumar Srivastava

Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2017.04.07 22:20:00 +05'30'

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२.मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५.सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६.मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई.
७.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८.सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
९.सर्व मंत्रालयीन विभाग.
१०.प्रबंधक, मूळ शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद व नागपूर.
११.प्रबंधक, अपील शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद व नागपूर.
१२.प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१३.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१४.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई.

१५.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई.

१६.सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.

१७.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

१८.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

१९.महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.

२०.महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.

२१.सचिव, राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.

२२.प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग, मुंबई - ४०० ००१.

२३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२४.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

२५.सर्व विभागीय आयुक्त.

२६.सर्व जिल्हाधिकारी.

२७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

२८.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

२९.सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख (मंत्रालयीन विभागांनी संबंधितांना प्रत पाठवावी)

३०.सामान्य प्रशासन विभाग/का.३९ (महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरीता).

३१.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई.

३२.सामान्य प्रशासन विभाग.

३३.निवडनस्ती, कार्यासन क्र.म-१.

*****